ध्वनी प्रदूषण ( नियंत्रण व नियमन ) नियम, २००० ची प्रभावीपणे अंमलबजावणी करणेसाठी प्राधिकृत अधिका-याची, ध्वनी प्रदुषण नियंत्रण प्राधिकरण म्हणून नियुक्ती करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२००९/अनौ.सं.२२/प्र.क्र.११६/नवि-२०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १४ ऑक्टोबर, २००९.

वाचा - १) शासन निर्णय पर्यावरण विभाग, क्रमांक- ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.९५/तांक-१, दिनांक २१ एप्रिल, २००९.
२) शासन पत्र नगर विकास विभाग, क्रमांक: संकीर्ण-२००९/अनौ.सं.२२/ प्र.क्र.११६ /नवि-२०, दिनांक १७ जून, २००९.

**प्रस्तावना :-**

पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.ध्वनीप्र/२०००/प्र.क्र.२४/तां.क्र.३, दिनांक- १६ ऑगस्ट, २००० व दिनांक १५ जून, २००१ रोजी ध्वनी प्रदुषण ( नियंत्रण व नियमन ) नियम, २००० च्या २ (क) नुसार, राज्यातील पोलीस आयुक्त असलेल्या शहरामध्ये पोलीस उप आयुक्त व इतर ठिकाणी जिल्हा पोलीस अधिक्षक यांना एक सदस्य प्राधिकरण म्हणून ध्वनी प्रदूषण नियमाची अंमलबजावणी करण्यासाठी नियुक्ती करण्यांत आली आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठाने सार्वजनिक हिताच्या याचिकांमध्ये महाराष्ट्र शासन व इतर विभागांनी ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन ) नियम, २००० ची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरिता दिनांक २६/२/२००९ रोजी ठराविक निर्देश दिलेले आहेत, त्यानुसार स्थानिक स्वराज्य संस्थांनी शहरी भागात शांतता झोन जाहीर करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :-**

१. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार तसेच ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन ) नियम, २००० च्या कलम ३ (५) नुसार स्थानिक स्वराज्य संस्थांनी शहरी भागात रुग्णालये, शैक्षणिक संस्था आणि न्यायालये यांच्या सभोवतालचे कमीत कमी १०० मीटर क्षेत्र शांतता झोन त्वरीत जाहीर करावेत. तसेच शहरात शांतता झोनचे फलक लावून आदेशाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी योग्य ती प्रसिध्दी करावी.

२. ध्वनी प्रदूषणाची वाढती पातळी व निरनिराळे प्रदूषण स्त्रोत विचारात घेता, सद्यःस्थितीत ते राबवित असलेल्या नियमाद्वारे ध्वनी प्रदूषण नियंत्रण व नियमनाची अंमलबजावणी करावी, त्याकरिता खाली

नमूद केल्याप्रमाणे, प्राधिकृत अधिका-यांची पदनाम प्राधिकरण म्हणून नियुक्ती करण्यांत येत आहे.

| अ.क्र. | कार्यालय/स्थानिक स्वराज्य संस्था यांचे कार्यक्षेत्र | पदनाम प्राधीकरण |
|---|---|---|
| १ | महानगरपालिका | आयुक्त / अतिरिक्त आयुक्त / उपायुक्त महानगरपालिका |
| २ | नगरपालिका / नगरपंचायती | मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपंचायती |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( र. शि. बाटगे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

आयुक्त, सर्व महानगरपालिका,
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई,
नगर विकास विभागातील सर्व कार्यासने,
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना योग्य त्या प्रसिध्दीसाठी
कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, यांना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्दीसाठी.
निवडनस्ती, (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

-----------